**अनुसूचित जाती , विमुक्त जाती,भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागासप्रवर्गाच्या उमेदवारांच्या जाती प्रमाणपत्र / दाव्यांची तपासणी - जात वैध / अवैध प्रमाणपत्रावर सदस्य सचिव यांची स्वाक्षरी शिक्क्यानिशी असण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : सीबीसी -१२/२०१० /प्र.क्र. १९३ /मावक -५**
**मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक :- १४ मे, २०१०.**

वाचा :-१) शासन निर्णय,विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग आणि विशेष मागासप्रवर्ग कल्याण विभाग क्रमांक :- सीबीसी-१२/२०००/२५२/प्र.क्र.१ / इमाव-५ ,दि. २५ जानेवारी, २०००

२) शासन परिपत्रक ,सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक:- सीबीसी-१०/२००९/प्र.क्र.९४४/मावक-५,दि. ०५ ऑक्टोबर,२००९

__प्रस्तावना__ :- मा. सर्वोच्च न्यायालयाने विशेष अनुज्ञा याचिका क्रमांक- १४७६७ /९३ ,सिव्हील अर्ज क्रमांक ५८५४/१९९४ कु. माधुरी पाटील विरुध्द अपर आयुक्त आदिवासी विकास , ठाणे व इतर यावर दिनांक ०२ सप्टेंबर, १९९४ रोजी दिलेल्या निर्णयानुसार राज्यामध्ये अनुसूचित जाती, विमुक्त जाती , भटक्या जमाती , इतर मागासवर्ग ,विशेष मागासप्रवर्गाच्या उमेदवारांच्या जाती प्रमाणपत्राची तपासणी करण्यासाठी जाती प्रमाणपत्र पडताळणी समित्यांचे गठन करण्यात आलेले आहे. जातीचे वैधता प्रमाणपत्रे निर्गमित करताना जाती पडताळणी समित्यांच्या तीन्ही अधिका-यांच्या सह्या व कार्यालयाच्या शिक्क्यानिशी निर्गमित करावे अशा प्रकारचे आदेश शासन निर्णय दि. २५ जानेवारी, २००० अन्वये दिलेल्या आहेत. मा. उच्च न्यायालयातील याचिका क्रमांक-६२९६ /२००९ योगेश शांताराम मोरे विरुध्द राज्य शासन व इतर या प्रकरणी दिलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने शासन परिपत्रक दिनांक ०५ ऑक्टोबर, २००९ अन्वये जात प्रमाणपत्र पडताळणी समित्यांचा निर्णय लेखी स्वरुपात संबंधीतांना कळविण्याची जबाबदारी एका सदस्यावर सोपविण्यात यावी अशा प्रकारचे आदेश निर्गमित करण्यात आलेले आहे. जाती वैध / अवैध प्रमाणपत्र निर्गमित करताना सद्यस्थितीत समितीच्या तीन्ही सदस्यांच्या स्वाक्ष-या आवश्यक असल्याने प्रमाणपत्रे निर्गमित करताना कालापव्यय होत असल्याचे शासनाच्या निदर्शनास आले आहे. यामध्ये सुधारणा करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-** संदर्भांकीत दिनांक २५ जानेवारी, २०१० च्या शासन निर्णयामधील परिच्छेद ३ मध्ये सुधारणा करण्यात येत असून सदरचा परिच्छेद आता खालील प्रमाणे वाचावा.

" ३. अनुसूचित जाती, विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागासप्रवर्ग दाव्याच्या संदर्भात निर्णय घेण्यासाठी प्रत्येक सुनावणीच्या मुलाखतीच्या वेळी **दोन** सदस्यांची गणपुर्ती आवश्यक राहील याबाबतची नोंद रोजनाम्यात घेण्यात यावी व त्यावर तिन्ही सदस्यांच्या स्वाक्ष-या झाल्यानंतर जात वैध / अवैध प्रमाणपत्रे **समितीचे सदस्य सचिव यांचे सहीने व कार्यालयाच्या शिक्क्यानिशी** निर्गमित करण्यात यावे. "

२. सदर आदेश विचारात घेऊन यापुढे सर्व समितीच्या सदस्य सचिवांनी सुधारीत प्रमाणपत्रे तयार करुन त्यानुसार समितीचा वैध / अवैध निर्णय अर्जदारास कळवावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असुन त्याचा संगणक संकेतांक **२०१००५१४१८१७३०००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**( भो.गों. गोंदोळे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रति,

मा. राज्यपाल यांचे सचिव,
मा. मुख्यमंत्री यांचे सचिव,
मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव
मा. विरोधी पक्ष नेते, विधान सभा, विधान भवन, मुंबई.
मा. विरोधी पक्ष नेते, विधान परिषद, विधान भवन, मुंबई.
महालेखापाल, महाराष्ट्र १ / २, मुंबई / नागपूर.
प्रधान सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई.
सर्व विभागीय आयुक्त
*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.
*प्रबंधक, उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई / नगापूर / औरंगाबाद.
*प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ न्याय शाखा, मुंबई / नगापूर / औरंगाबाद.

सर्व मंत्रालयीन विभाग,

त्यांना विनंती करण्यात येते की, त्यांनी सदर आदेश त्यांचे अधिपत्याखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख यांचे निदर्शनास आणून द्यावेत.

संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.

संचालक, विमुक्त जाती भटक्या जमाती व इतर मागासवर्ग कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.

संचालक, माध्यमिक व उच्च माध्यमिक / प्राथमिक शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.

संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.

संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

संचालक, वैद्यकीय शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

सर्व जिल्हाधिकारी तथा जिल्हा दंडाधिकारी

सदस्य सचिव तथा संशोधन अधिकारी, सर्व विभागीय जाती प्रमाणपत्र पडताळणी समित्या १ व २, विभागीय समाजकल्याण अधिकारी यांचे कार्यालय, नवी मुंबई, पुणे, नाशिक, औरंगाबाद, नागपुर, अमरावती, लातुर

सर्व विभागीय समाजकल्याण अधिकारी /सर्व जिल्हा समाजकल्याण अधिकारी

सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी

आयुक्त, सर्व महानगर पालिका

मुख्याधिकारी, सर्व नगरपालिका

सर्व कार्यासन, सा.न्या. व वि.स. विभाग, मंत्रालय, मुंबई.

महासंचालक, माहिती व जनसंपर्क, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.* पत्राद्वारे.

यांना विनंती की, त्यांनी सदर परिपत्रकास व्यापक प्रसिध्दी द्यावी.

निवड नस्ती, का मावक-५